**महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई या कार्यालयास सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी कार्यक्रमांतर्गत अनुदान वितरीत करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**अल्पसंख्याक विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : उसाअ-२०२३/प्र.क्र.११/उसाअ/का-४**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ००३२
दिनांक:- ०९/०७/२०२४

**वाचा :-**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्रमांक : शासन परिपत्रक, अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.०१.०४.२०२४
२) शासन निर्णय अल्पसंख्याक विकास विभाग क्र: उसाअ-२०२४/प्र.क्र.११/उर्दू अकादमी/ का-४, दि. ०४.०७.२०२४

**प्रस्तावना:-**

राज्यात उर्दू भाषेचा विकास, संवर्धन, प्रगती तसेच उर्दू व मराठी भाषेतील साहित्यिकांमध्ये वैचारिक आदान प्रदान होऊन राष्ट्रीय एकात्मतेची भावना दृढ व्हावी या उद्देशाने महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीची स्थापना करण्यात आली आहे. महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीमार्फत विविध कार्यक्रम राबविण्यासाठी वरील संदर्भ क्र.२ येथील शासन निर्णयातील मार्गदर्शक सूचनांनुसार रु.२१,१२,०००/- (अक्षरी रुपये एकवीस लाख बारा हजार फक्त) इतके अनुदान या कालावधीत खर्च करण्यास प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. त्यानुसार सन २०२४-२५ या आर्थिक वर्षासाठी महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी करिता अनुदान वितरीत करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

सन २०२४-२५ या आर्थिक वर्षाकरिता मंजूर असलेल्या अनुदानापैकी एप्रिल, २०२४ ते जुलै, २०२४ या ०४ महिन्यांकरिता रुपये २१,१२,०००/- इतके अनुदान वितरीत करण्यास संदर्भ क्रमांक ०१ येथील शासन परिपत्रकान्वये मान्यता प्रदान करण्यात आलेली वितरण व संवितरण प्रणालीवर (बीम्स) रुपये २१,१२,०००/- (अक्षरी रुपये एकवीस लाख बारा हजार फक्त) इतकी रक्कम वितरणासाठी उपलब्ध आहे. सदर बाब विचारात घेता, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीला विविध कार्यक्रम राबविण्याकरिता सन २०२४-२५ मध्ये माहे एप्रिल, २०२४ ते जुलै, २०२४ या ४ महिन्यांकरिता अर्थसंकल्पीत करण्यात आलेल्या रुपये २१,१२,०००/- (अक्षरी रुपये एकवीस लाख बारा हजार फक्त) इतक्या रकमेचे कार्यक्रमांतर्गत अनुदान महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई या कार्यालयास खालील ०६ योजनांसाठी वितरीत करण्यात येत आहे.

| अ.क्र | योजना | खर्च मर्यादा |
|---|---|---|
| १ | इम्कान या त्रैमासिकांचे प्रकाशन | **रु.१,००,०००/-** |
| २ | उर्दू मुशायरा आयोजित करणे. | **रु.४,००,०००/-**<br>२६ जानेवारी रोजी गेट वे ऑफ इण्डिया, मुंबई येथे मुशायरा.(संचालक, पुरातत्व विभाग, मुंबई कार्यालयात सदर कार्यक्रमाचे शुल्क व अनामत रक्कम भरण्यासाठी रु.१.०० लाख) व राज्यातील कोणत्याही एका शहराध्ये रुपये ३ लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले मुशायऱ्याचे आयोजन. |
| ३ | राज्य स्तरीय / जिल्हा स्तरीय कार्यशाळा / सेमिनार व उर्दू-मराठी संमेलन आयोजित करणे. | **रु.३,००,०००/-**<br>राज्यातील कोणत्याही एका शहरामध्ये रु.३.०० लाख इतकी कमाल खर्च मर्यादा असलेले सेमीनार. |
| ४ | उर्दू भाषा कार्यक्रम आयोजित करण्यासाठी उर्दू शाळा व महाविदयालयांना अनुदान मंजूर करण्याबाबत. | **रु.१,४५,०००/-**<br>१० कॉलेज (१० x१०,००० = १,००,०००/-)<br>९ शाळा (९ x ५,००० = ४५,०००/-) |
| ५ | उर्दु ग्रंथालयांना नियतकालिके व पुस्तके पुरविणे. | **रु.५,६७,०००/-** |
| ६ | उर्दू हस्तलिखिताचे प्रकाशन तसेच मराठी-उर्दू अनुवादकांना आर्थिक अनुदान देणे. (कॅलेंडर वर्ष २०२२) | **रु. ६,००,०००/-** |
| | **एकूण** | **रुपये २१,१२,०००/-**<br>(अक्षरी रुपये एकवीस लाख बारा हजार फक्त) |

२. उपरोक्त तक्त्यामधील रुपये २१,१२,०००/- (अक्षरी रुपये एकवीस लाख बारा हजार फक्त) इतका निधी अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना सुपूर्द करण्यात येत आहे. अवर सचिव (१), अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना आहरण व संवितरण अधिकारी तसेच उप सचिव, अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई यांना नियंत्रक अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे.

३. सदरहू रक्कम “मागणीक्र. झेडई-०१, लेखाशीर्ष २२३५ सामाजिक सुरक्षा व कल्याण, ०२ समाज कल्याण, २०० इतर कार्यक्रम ०१- अल्पसंख्याक सहाय्य (०१) (२३) महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमीच्या विविध योजनांसाठी सहाय्यक अनुदान (कार्यक्रम) ३१-सहाय्यक अनुदाने (वेतनेत्तर) (२२३५ बी ०९४)” या लेखाशिर्षा खाली सन २०२४-२५ च्या मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

४. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक, अर्थसं-२०२४/प्र.क्र.३४/अर्थ-३ दि.०१.०४.२०२४ अन्वये प्राप्त अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२४०७०९१७०६१२३०१४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

VISHAKHA SACHIN ADHAV

Digitally signed by VISHAKHA SACHIN ADHAV
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=MINORITIES DEVELOPMENT DEPARTMENT,
2.5.4.20=b2ad90146c0c24582e5f69373fdb00dd8bff89e962d3f5d3bb153e589b39cc43,
postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=65EF4533476D0EA1DB9995A9B28EDC4173C3B94922081D293614536B5BEAD664, cn=VISHAKHA SACHIN ADHAV
Date: 2024.07.09 17:17:02 +05'30'

**( विशाखा आढाव )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत** :-

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता, महाराष्ट्र १/२,मुंबई/नागपूर,
२. महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र १/२,मुंबई/नागपूर
३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
४. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
५. अवर सचिव/कक्ष अधिकारी,(का-२)/(का-४)/(का-७) अल्पसंख्याक विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
६. अधिक्षक नि कार्यकारी अधिकारी, महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.
७. निवडनस्ती (महाराष्ट्र राज्य उर्दू साहित्य अकादमी, मुंबई.)

---